**सहाय्यक संचालक, गट-ब, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय या संवर्गातील अधिकाऱ्यांची दि.०१/०१/२०१८ ची तात्पुरती सामायिक ज्येष्ठतासूची.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन परिपत्रक क्र.- औसुवआ-०५१८/प्र.क्र.६५/कामगार-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ९ ऑगस्ट, २०१८.

**परिपत्रक**

सहाय्यक संचालक, गट-ब, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय या संवर्गातील अधिका-यांची दि.०१.०१.२०१८ ची तात्पुरती सामायिक ज्येष्ठतासूची या परिपत्रकासोबत जोडण्यात आली आहे. सदर ज्येष्ठतासूची सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. एसआरव्ही २०११/प्र. क्र.२८४/१२, दि.२१/१०/२०११ मधील सूचनांनुसार तयार करण्यात आलेली आहे.

२. प्रभारी संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय यांना विनंती करण्यात येते की, सदर ज्येष्ठतासूची सर्व संबंधित अधिका-यांच्या (रजेवर/प्रतिनियुक्तीवर असलेल्या अधिकाऱ्यांसह) निदर्शनास आणावी व तसे कळविल्याबाबत त्यांची स्वाक्षरी घेतलेली प्रत अभिलेखात ठेवावी. तसेच सदर ज्येष्ठतासूची संदर्भातील आक्षेप/त्रुटी याबाबत संबंधितांनी तात्काळ निवेदन सादर करावे. त्याप्रमाणे प्राप्त झालेल्या निवेदनातील वस्तुस्थिती संबंधितांच्या उपलब्ध अभिलेख्यांवरुन तपासून सविस्तर अभिप्रायांसह निवेदने शासनास यथाशीघ्र ( पंधरा दिवसात) पाठवावीत. याबाबत आक्षेप/माहिती प्राप्त न झाल्यास ज्येष्ठतासूचीबाबत कोणताही आक्षेप नसल्याचे गृहीत धरुन अंतिम ज्येष्ठतासूची प्रसिध्द करण्यात येईल.

३. सदर परिपत्रक, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेताक २०१८०८०९१७००३९३७१० असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Satish Bhartiya

Digitally signed by Satish Bhartiya
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2bc2294cab74b107d5cfbd8bda13dc5782df4340706cbae9c3aa79354a2cd32b, serialNumber=5e865d0cdc2a4b33d56e3ba0f1693db677c69e1582ba24d78c4b12a02126e493, cn=Satish Bhartiya
Date: 2018.08.09 17:05:59 +05'30'

**(सतिश भारतीय)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/ विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२. सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद सदस्य.
३. प्रभारी संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, कामगार भवन, ५ वा मजला, बांद्रा-कुर्ला कॉम्प्लेक्स, वांद्रे (पूर्व),मुंबई.

**प्रतः-**

१) प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहाय्यक, उ.ऊ. व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) निवड नस्ती, (कामगार-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

## सहाय्यक संचालक संवर्गाची दिनांक-०१/०१/२०१८ ची तात्पुरती सेवा ज्येष्ठता यादी.

(उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन परिपत्रक क्र.- औसुवआ-०५१८/प्र.क्र.६५/कामगार-१, दि.९ ऑगस्ट,२०१८ सोबतचे प्रपत्र)

| अ. क्र. | ज्येष्ठता क्रमांक/ गुणवता क्रमांक | नांव | पदोन्नती/ सरळसेवेने नियुक्तीचा प्रवर्ग | अधि-काऱ्याचा जात प्रवर्ग | जन्म तारीख | नियुक्ती/ पदोन्नतीचा दिनांक | नियुक्तीचा मार्ग (सरळ सेवा/ पदोन्नती) | सेवा निवृत्तीचा दिनांक | शैक्षणिक अर्हता | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ |
| १ | २९ | श्री. श. म. धनविजय | अ.जा. | अ.जा. | २०/०४/१९७९ | ३१/०८/२०१२ | सरळसेवा | ३०/०४/२०३७ | बी.टेक. (केमिकल) | दि. ३/८/२०१२ अन्वये सहा. संचालक पदावर नियुक्ती |
| २ | ३१ | श्री. अ. ति. मडावी | अ.ज. | अ.ज. | १०/०९/१९८३ | २५/१०/२०१२ | सरळसेवा | ३०/०९/२०४१ | बी.ई. (मेकॅनिकल) | दि. १६/१०/२०१२ अन्वये सहा. संचालक पदावर नियुक्ती |